नागपूर महानगरपालिकेच्या शहर बस सेवेच्या संदर्भात मे.वंश निमय इन्फ्राप्रोजेक्टस लि. व नागपूर महानगरपालिका यांच्यातील कराराची तपासणी व कंपनीच्या कारभाराची चौकशी विभागीय आयुक्त, नागपूर विभाग यांचेमार्फत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : नामपा-२०१५/प्र.क्र.४०/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ०९ मार्च, २०१७

**संदर्भ** : (१) आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.एमसी/४०५/२०१३ दि.२७/१२/२०१३, पत्र क्र.एमसी/५३५/२०१४,दि.२१/०४/२०१४,पत्र क्र.एमसी/६७१/२०१४दि.१२/११/२०१४, व पत्र क्र.एमसी/२०२/२०१५ दि.०३/१०/२०१५
(२) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांचे विधी व न्याय विभागास लिहिलेले पत्र क्र.ए-१२२२/९३ / ४५८४/२०१६ दिनांक ९/११/२०१६
(३) समक्रमांक दिनांक २८ सप्टेंबर, २०१६ चा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-**

नागपूर महानगरपालिकेने पी.पी.पी. तत्वावर मे.वंश निमय इन्फ्राप्रोजेक्टस् लि. यांना शहर बस संचालनाचे कंत्राटी पध्दतीवर काम दिलेले आहे. याबाबत नागपूर महानगरपालिका व मे.वंश निमय इन्फ्राप्रोजेक्टस लि. यांचयात याबाबत दिनांक ०९/०२/२००७ व पूरक करार दिनांक ०३/०३/२०१० मध्ये झालेला आहे. या करारानुसार सदरची कंपनी योग्यरित्या काम करत नसल्यामुळे जनतेला असुविधांचा सामना करावा लागत आहे. त्याअनुषंगाने नागपूर महानगरपालिका व मे.वंश निमय इन्फ्राप्रोजेक्टस् लि. यांच्यातील उक्त कराराची तपासणी व या कंपनीकडून चालविण्यात येत असलेल्या स्टार बसच्या कारभाराची चौकशी करण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालयाच्या सेवानिवृत्त न्यायाधीशांची नियुक्ती करण्यात यावी व त्याप्रमाणे नागपूर महानगरपालिकेला नाव कळवावे, या प्रस्तावाच्या अनुषंगाने, संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला होता. तथापि, सदर पदासाठी मुंबई उच्च न्यायालयाच्या कोणत्याही न्यायमूर्तींनी इच्छुकता दर्शविली नसल्याचे महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांनी संदर्भाधीन क्र.०२ येथील पत्रान्वये कळविल्याच्या पार्श्वभूमीवर संदर्भाधीन क्र.०३ येथील शासन निर्णयामध्ये सुधारणा करुन, आता प्रस्तुत प्रकरणी सदरची चौकशी करणे व शासनास अहवाल सादर करण्याबाबत विभागीय आयुक्त, नागपूर विभाग यांची या प्रकरणी नियुक्ती करण्याबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुलक्षून शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

०१. नागपूर महानगरपालिका व मे.वंश निमय इन्फ्राप्रोजेक्टस् लि.यांच्यात नागपूर शहर बस संचालन करण्याबाबत दिनांक ०९/०२/२००७ अन्वये झालेला करार व यासंदर्भातील दिनांक ०३/०३/२०१० चा पूरक करार तसेच मे.वंश निमय इन्फ्राप्रोजेक्टस् लि. कडून चालविण्यात येत असलेल्या स्टार बसच्या कारभाराची चौकशी करण्यासंदर्भात, आता विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांची या शासन निर्णयाद्वारे नियुक्ती करण्यात येत असून, या प्रकरणाची सहा महिन्यात चौकशी पूर्ण करण्यात येऊन, तत्संबंधीचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

०२. याबाबत आवश्यक ती सर्व कागदपत्रे विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांना सादर करण्याबाबत नागपूर महानगरपालिकेने कार्यवाही करावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०९१७३०३७९३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.09 17:30:31 +05'30'

**(ज.ना.पाटील)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
२) आयुक्त, नागपूर महानगरपालिका,नागपूर
३) सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी,नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.